कार्यकारी अभियंता (स्थापत्य) यांची पदस्थापना.

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक बांधकाम विभाग

**शासन आदेश क्रमांकः बदली-११२४/प्र.क्र.१३६(२)/सेवा-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: ०७ ऑगस्ट, २०२४.

**संदर्भ :- सा.बां.विभाग, शासन आदेश क्र.लाप्रवि-२०२३/प्र.क्र.२३/सेवा-६(क), दि.०७.०८.२०२४.**

**शासन आदेश :-**

श्री. महेश प्रतापराव पाटील, कार्यकारी अभियंता हे त्यांच्याविरुद्ध सुरु असलेल्या शिस्तभंगविषयक कारवाईच्या अनुषंगाने दि.०३.०३.२०२३ पासून मानीव निलंबित होते. निलंबन आढावा समितीच्या दि.२९.०४.२०२४ रोजीच्या बैठकीतील निर्णयानुसार, श्री. पाटील, कार्यकारी अभियंता यांचे निलंबन संपुष्टात आणून त्यांची पदस्थापना नाशिक सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभागाबाहेर अकार्यकारी पदावर करण्यात यावी, अशी शिफारस केली आहे. संदर्भाधीन शासन आदेशान्वये, श्री. म. प्र. पाटील, कार्यकारी अभियंता यांना शासन सेवेत पुन:स्थापित करण्यात आले आहे. त्यानुसार, श्री. महेश प्रतापराव पाटील, कार्यकारी अभियंता यांची पदस्थापना सक्षम प्राधिकारी यांच्या मान्यतेने कार्यकारी अभियंता, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, वरळी, मुंबई या रिक्त पदावर करण्यात येत आहे.

२. श्री. पाटील यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरित स्वीकारावा व आपला पदग्रहण अहवाल शासनास विनाविलंब सादर करावा. संबंधित अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियमानुसार दिलेल्या पदग्रहण अवधीतच, पदस्थापनेच्या पदावर रुजू होणे आवश्यक राहील, अन्यथा त्यांचा अनुपस्थितीचा कालावधी हा अकार्यदिन (dies non) म्हणून गणला जाईल. तसेच, त्यांचे लक्ष महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम २३ कडे वेधण्यात येत आहे. सदर नियमातील तरतूदी लक्षात घेता, त्यांनी पदस्थापनेत बदल करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील.

३. संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, श्री. पाटील यांना बदलीच्या ठिकाणी रुजू होण्यासाठी तात्काळ कार्यमुक्त करावे. तसेच, पदमुक्त व पदमोचक अधिकाऱ्यांनी अनुक्रमे कार्यभार सोडल्याचा तसेच कार्यभार स्वीकारल्याचा दिनांक त्वरित शासनास doser1.pwd@maharashtra.gov.in या ई-मेल पत्त्यावर कळवावा.

४. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दि.१७.१२.२०१६ व दि.१६.०२.२०१८ मधील परिच्छेद क्र.५ (अ) (६) मधील तरतूदीनुसार, संवर्ग नियंत्रण विभाग म्हणून कार्यकारी अभियंता (स्थापत्य) या संवर्गामध्ये समाविष्ट केलेल्या पदांवर अधिकाऱ्याची बदलीने पदस्थापना या विभागामार्फत करण्यात येत आहे.

५. वर नमूद अधिकाऱ्यांनी नवीन पदस्थापनेच्या पदाचा कार्यभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास तसेच संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, हॉटेल सागर प्लाझा समोर, कँप, पुणे यांना कळवावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८०७१७०८०५३२१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DATTATRAY
VASANTRAO KHARKE

Digitally signed by DATTATRAY VASANTRAO KHARKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT,
2.5.4.20=d598800beb5ed37ae09d78fff05921827123426ec3977a7476478ce183be979d, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=6BAEF55AD6F77A3A40CCCC3E9DD0F50E344AB83A754542299875CF07868ED88B, cn=DATTATRAY VASANTRAO KHARKE
Date: 2024.08.07 17:22:27 +05'30'

**(द.व.खारके)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. मा. उप मुख्यमंत्री (गृह) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा. उप मुख्यमंत्री (वित्त) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
५. महालेखापाल-१/२, (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा ) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
६. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई /कोकण / पुणे / नाशिक / छत्रपती संभाजीनगर / नांदेड / अमरावती / नागपूर / राष्ट्रीय महामार्ग, नवी मुंबई,
७. मुख्य अभियंता, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.
८. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
९. संचालक (उपवने व उद्याने), महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१०. संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, हॉटेल सागर प्लाझा समोर, कँप, पुणे,
११. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१२. संबंधित अधिकाऱ्यास मुख्य अभियंता यांच्या कार्यालयामार्फत,
१३. मा. मंत्री, सा.बां. (सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१४. मा. मंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१५. अपर मुख्य सचिव (सा.बां.), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई, यांचे स्वीय सहायक,
१६. सचिव ( रस्ते / बांधकामे ), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई, यांचे स्वीय सहायक,
१७. सर्व सहसचिव / उपसचिव / अवर सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१८. कार्यासन अधिकारी ( सेवा-६ / संगणक कक्ष ), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१९. निवडनस्ती.